# क्रमांक १: ज्ञानदेवशक

महाराष्ट्रांत रामदेवराय यादवांच्या काळांत महानुभावांनी आपल्या पंथाची ओळख करून देतांना मराठींतच ग्रंथ-रचना केली. या पन्थांतील कवि आणि लेखकांना महाराष्ट्र व मराठी भाषा याविषयीं अत्यन्त आस्था होती, आत्मीयता होती, प्रेम होतें.

मूळचे गुर्जर प्रान्तांतील असूनहि स्वत: चक्रधरांना महाराष्ट्राविषयीं विशेष अभिमान असल्याचें दिसून येतें. त्यांचे हे उद्‍गार पहा, ‘‘कानडादेशा, तेलंगणदेशा, न वचावें, महाराष्ट्रीय असावें,’’ असा आपल्या अनुयायांना ग्रंथ-लेखनासंबंधीं त्यांचा दंडक होता. चक्रधरांचे शिष्य नागदेवाचार्य यांनी ‘‘ब्रह्मविद्येस माझिया स्वामीचा परिवारू नागवैल कीं, भणोनी हे केशवा, संस्कृत सूत्रबद्ध प्रकरण न करी तूं’’ असा आपल्या शिष्यांना उपदेश केला आहे.

या पन्थांतील कवींनी व ग्रंथकारांनी मराठींतच उच्चदर्जाची अलोट वाङ्मय निर्मिती केली. महाराष्ट्र शारदेचें हें अपूर्व दालन उघडे झाल्यापासून मराठी भाषेला पुष्टी आली, तिचें सौंदर्य वाढलें. मराठीचे

पडसाद त्यांनी आसेतु-हिमाचलापर्यन्त पोचविले. त्यांनी आपल्या परीनें महाराष्ट्र भाषेची फार चांगली सेवा केली. गद्य-पद्याचे अनेकविध नमुने, वर्णन प्रकारांची विविधता, रसाळपणा, ओघवती शैली अशा विशेषांनी महानुभावांनी मराठी भाषा सजविली. इतकेच नव्हें, तर महाराष्ट्र भाषेचें व्याकरण आणि कोश इत्यादि वाङ्मयहि निर्माण केलें. महानुभाव कवि आणि लेखक यांचें मराठीविषयींचें हें प्रेम पाहून मन मोहून जातें.

मात्र, काळाच्या ओघांत घडत असलेल्या या भाषेला ज्ञानदेवांनी अंतर्बाह्य उजळून अद्वितीय प्रतिष्ठा मिळवून दिली. ‘‘माझा मराठाचि बोलू कवतिकें। परी अमृतातेंहि पैजा जिंकें। ऐसी अक्षरें रसिकें। मेळवीन।। अशी प्रतिज्ञा करून त्यांनी ती तडीस नेली. त्यांनी मराठी भाषेचें अक्षरशः सोनें केलें. यामुळेंच संस्कृत भाषा कोविदांचा मराठी भाषेसंबंधीचा पूर्वग्रह समूळ बदलला. याशिवाय ज्ञानदेवांनी मराठी भाषेला एक फार वेगळी प्रतिष्ठा प्राप्त करून दिली आणि त्यांचें हें मराठी भाषेला फार मोठे योगदान आहें.

त्या काळांत आणि हजारो वर्षांपासून वैदिक धर्माचें रक्षण करणारा विद्यासंपन्न ब्राह्मण वर्ग होता. कोणताहि धर्मपंथ असला तरी तो वेदाच्या अविरूद्ध असेल तरच मान्यता पावतो अशी स्थिती होती. 'श्रुतेरिवार्थंस्मृतिरन्वगच्छत्' हाच न्याय सर्व बाबतींत लागू होता. ''वेदोऽखिलोऽधर्ममूलम्'' भारतीयांची ही जीवन-निष्ठा हजारों वर्षांपासून चालत आलेली असून ती अढळ राहिलेली आहे. भारतीय धर्म व तत्त्वज्ञान यांचें स्वरूप सर्वार्थानें आणि पूर्णार्थानें विशद करणारे प्रस्थानत्रय— म्हणजे दशोपनिषदें, ब्रह्मसूत्रें, आणि श्रीद्भवद्गीता—या भरतखण्डांत प्रमाणभूत होऊन राहिलेलें आहें.

यामुळें एकादी व्यक्ति अगदी महामानवाच्या योग्यतेची असूनहि जर ती प्रस्थानत्रयाविषयीं कांहीं लिहीत नसेल तर विद्वज्जनांना ती आदरणीय होत नाही. प्रस्थानत्रयांतील एक ग्रंथ जो गीता तोच ज्ञानदेवांनीं भाष्यासाठीं—टीकेसाठीं—कां निवडला; दुसरा एकादा ग्रंथ कां निवडला नाही याचें कारण आतां आपल्या ध्यानीं येईल. दुसरें असे कीं, गीताच कां निवडली, ब्रह्मसूत्रें कां घेतली नाहीत? याचें खरे कारण असे कीं, भगवद्गीता हा दैनंदिन व्यवहारांत असणाऱ्या बहुजन समाजाचा ग्रंथ आहे. गीता सर्व वेदांचा अर्क आहे; यामुळेंच जीवनाचें खरे सार्थक

करणारा ग्रंथराज आहे. शङ्कराचार्य म्हणतात,''तदिदं गीताशास्त्रं समस्त वेदार्थ सारसंग्रहभूतं दुर्विज्ञेयार्थम्। तदर्थे विज्ञाते समस्त पुरूषार्थ सिद्धिः अतः तद्विवरणे यत्नः क्रियते मया।'' गीता-शाङ्कर-उपोद्घात-भाष्य.

आचार्यांनी प्रामाणिकपणें आणि नम्रतापूर्वक वस्तु-स्थिती निवेदन केली आहे कीं, गीता दुर्विज्ञेयार्थ आहे. ''अतः तत् विवरणे मया यत्नः क्रियते ।'' म्हणून त्याच्या विवरणासाठीं माझ्याकडून प्रयत्न केला जात आहे. असा कर्मणि प्रयोग त्यांनी योजिला आहे. ब्रह्मसूत्र भाष्यांत 'वयं ब्रूमः' अशी गर्जना करणाऱ्या आचार्यांची गीताभाष्यांतील अगतिकतेची भाषा गीतेची महानताच दर्शविते. मूर्ख नेहमी ठामपणे सांगतो मात्र प्रबुद्ध जबाबदारीनें, जपून बोलतो. दुर्विज्ञेयार्थता ही गीतेसंबंधीं वस्तुस्थितीच आहे; पण आचार्यांची ती नम्रता त्यांच्या उत्तुंग ज्ञानाचा सहज परिणाम म्हणून मानावी लागेल. या संदर्भांत वामन पंडितांची 'यथार्थ दीपिका' पहा. स्पष्ट बोलण्याची जरूरी नाहीं. कोणालाहि तिच्यासंबंधीं मनोमन जाणवेल.

ज्ञानदेव म्हणतात, एऱ्हवी मी मूर्ख आहे, तरीहि गीतार्थ करण्याचें धाडस करतों आहें, हें आकाशाला गवसणी घालण्यासारखे आहे.

गीतार्थासंबंधीं वस्तुस्थिती अक्षरश: अशीच आहे. आचार्य अथवा ज्ञानदेव यांत काडीइतकीहि अतिशयोक्ति करीत नाहीत; याबरोबर हेहि खरे आहे कीं, ही गोष्ट ते दोघे मुक्तमनानें व नि:संकोच प्रकट करतात यावरून प्रतीत होणारी त्यांच्या ज्ञानाची गगनाएवढी उंची आणि सागराएवढी खोली आम्हां पामरांना कशी कळावी? त्यांचा गौरव करताना त्यांची निंदा तर होणार नाही ना! अशीच भीति वाटते.

यासदृश हें एक उदाहरण पहा, ‘‘सखया तुझेनि उद्देशें। भेटावया जीव उल्हसे। कीं सिद्धचि भेटी विसकुसे। ऐसिया बिहे।। यासाठीं, मौनाची अक्षरें भली। रचोनि गोठी केली मेळियेची।।’’

आचार्य अथवा ज्ञानदेव यांच्यासंबंधीं कांहीं बोलणें फार फार अवघड आहे. त्यांच्या वाङ्मयोदधींत आकंठ बुडावे यासारखा दुसरा उपाय नाही.

आतां राहिला प्रश्न भाषेचा. मराठी भाषा ही धर्म व तत्त्वज्ञान यांच्या अर्थाची वाहक होऊं शकते कां? धर्म-तत्त्वज्ञानाचा गहन-गंभीर आशय मराठीला पेलवेल कां? खरेच एकेकाळीं ही फार अवघड समस्या होती. म्हणून तर पूर्वसूरी लोकभाषेंतून वेदार्थ

विशद करण्याला कचरत होते. बरोबरच आहे तें! हें एऱ्यागबाळ्याचें कामच नव्हतें

मात्र, महाराष्ट्रांत असा चमत्कार घडला. वेदार्थ विशद करणारा ग्रंथ मराठी भाषेंत निर्माण झाला. याचें कारण ज्ञानदेवांची असामान्य आणि महनीय योग्यता! मराठी भाषेचें नेत्रदीपक सामर्थ्य ज्ञानदेवांनी प्रकट केलें, हा एक अत्यद्भूत चमत्कारच घडला. आपल्या अर्थवाहक प्रभावानें, गांभिर्यानें, भाषेच्या सौंदर्यानें, प्रसादानें, अलंकार उपमादि भूषणानें, लालित्यानें, शालीनतेनें आणि काव्यमयतेनें ज्ञानदेवांची स्निग्ध-मधुर वाणी जी एकदम प्रकट झाली आणि इतकी विलक्षण प्रतिष्ठा पावली कीं, विद्यासंपन्न वर्गाची मतिच कुंठित झाली, त्यांचें नेत्र दिपलें आणि तिचा गुणगौरव करण्यासाठीं भल्याभल्यांचें शब्द-भांडारहि अपुरे पडूं लागलें. या महाराष्ट्र भू-मंडळांत विश्वामित्रालाहि लाजवील अशी नूतन सृष्टि निर्माण झाली. 'इयें मराठीचियें नगरीं' ब्रह्मविद्येचा सुकाळ झाला आणि याबरोबरच मराठीनें कीर्तीचा गौरीशंकर गाठला.

विश्वाच्या वाङ्मयांत ज्ञानेश्वरीसारखा सर्वांगसुंदर ग्रंथ झालाच नाही.

ज्ञानदेवांचें हें ऋण मराठी भाषिकांना कधीहि फेडता येणार नाही. त्यांचे एवढे अनंत आणि चिरकालीन उपकार आहेत कीं, त्यांच्या या ऋणासाठीं हा उभा महाराष्ट्र त्यांचा पाइक होऊन राहील आणि त्यांच्या मोचे-वहाणा सदैव उरीं-शिरीं धरेल. तें ऋणशेष वाचा इया। न फेडवेचि मरोनिया। तें पाया पडोनी मिया । सोडवियलें ।।

आतां महाराष्ट्र दिनदर्शिकेंमध्यें मी ७१४ हा ज्ञानदेवशक कां मानला ते सांगतो.

तेथ महेशान्वय संभूते। श्री निवृत्तिनाथ सुतें।
केलें ज्ञानदेवें गीते। देशीकार लेणें।।

गीतेवर ज्ञानदेवांनी हा महाराष्ट्र भाषेचा अलंकार घातला आहे. लोक म्हणतात, ज्ञानदेवांनी गीतेवर भाष्य केलें आहें, टीका केली आहे. मला नाहीं तसें वाटत. माझ्या मतें ज्ञानदेव हे उपजत कवि-प्रकृतीचें. त्यांचा पिंडच मुळी तसा. ते काव्यच बोलायचें, काव्यच जगायचें असे त्यांचें चरित्र. त्यांना लोक कल्याणासाठीं आणि प्राचीन परंपरेच्या रक्षणासाठीं गीतेवर बोलणें आवश्यक वाटलें किंबहुना त्यासाठींच त्यांचा अवतार होता. त्यांचें तें जीवन-

कार्य होतें. आतां हें ध्यानीं घ्या कीं, ज्याच्या जीवनांत काव्य कांठोकांठ भरलें आहें तो दुसऱ्या वेगळ्या पद्धतीनें कसे काय बोलणार?

यामुळेंच, त्या वेळीं, ज्ञानदेव गीतेवर जें बोललें त्याला काव्यगायनाचेंच स्वरूप प्राप्त झालें. नव्हें, ते उन्मुक्तपणें गातच राहिले असे म्हटल्यास तें चूक ठरूं नयें. त्यांचा उद्देश एकच,

कांठोकांठ भरूं द्या पेला, फेस भराभर उसळूं द्या
प्राशन करितां रंग जगाचे, क्षणोक्षणीं ते बदलूं द्या

गीतार्थेंसि विश्व भरूं।.
आनंदाचे आवारूं। मांडूं जगा।।

येथें पूर्वार्ध पूर्ण झाला.

# ज्ञानदेवशक : उत्तरार्ध

ज्ञानदेवांच्या व्यक्तित्वांतील कवि, तत्त्वज्ञानी आणि आत्मानुभवी हे तीनहि पैलू गीतेंवरील विवेचनाच्या ओघांत जणूं एकमेकावर मात करतात असे जाणवतें. यामुळें कवि ज्ञानदेव श्रेष्ठ आहेत कां तत्त्वज्ञानी अथवा आत्मानुभवी ज्ञानदेव श्रेष्ठ आहेत, हा निर्णय करणे खरोखर अवघड आहे. सर्वांगांनी हें व्यक्तिमत्व इतके एकसंध आहें कीं, तीं सर्वच अंगें एकसमान उच्च कोटीची आहेंत. त्यांत तर-तम भाव करताच येत नाही. समजा बर्फीसारखा पदार्थ आहे, तिच्यांतील वजन, आकार व गोडी तुम्हांस वेगवेगळी करून दाखविता येतील काय? कवि, तत्त्वज्ञानी, आत्मानुभवी इत्याहि अनेकविध अंगांनी समृद्ध असणारें हें अनुपम व्यक्तित्त्व आहें.याच तोडीचें पण व्यावहारिक भूमिकेवर असलेलें शिवरायांचें व्यक्तित्त्व. हीं दोन्हीं व्यक्तित्त्वें अनुपम आहेत, अद्वितीय आहेत, आणि लोकविलक्षण आहेत.

महाराष्ट्रांत एकापेक्षांहि एक असे कितीतरी श्रेष्ठ पुरूष होऊन गेले आहेत. पण ज्ञानदेव आणि शिवराय यांचें यश ओलांडून अद्याप कोणीहि गेले नाहीं. आणि यापुढेहि ही गोष्ट घडण्याची शक्यता

अशक्य कोटींतील आहे. या महाराष्ट्रवासियांनी जन्मोजन्मीं बहु पुण्य केलें असलें पाहिजे आणि यामुळेंच कीं काय, या महाराष्ट्राला हीं महान् नररत्नें लाभलीं. हें महाराष्ट्राचें भाग्य खरोखर हेवा वाटण्यासारखे आहें.

अशा प्रकारें या अनन्यसाधारण व्यक्तित्त्वांना केवळ पुरूषश्रेष्ठ म्हणावे, तरी अपूर्ण वक्तव्याचा दोष पदरीं येतो आणि त्यांना राम-कृष्णासारखे अवतारी पुरूष म्हणावें, तर हें तरी कितपत योग्य होईल, हीहि शंका रहातेच. मोठे जटिल गणित आहे हें! अगदी, तुज, सगुण म्हणो कीं, निर्गुण रे! अशासारखे. मात्र याच भजनाच्या अर्थानें हा पेच निदान माझ्याबाबत मी सोडविला आहे.

तुज सगुण म्हणो कीं निर्गुण रे ।

तर्कशास्त्र विचारतें, ईश्वराला तुम्हीं कोणत्या कोटींत घालणार?

श्रुति म्हणते, कोणत्याच कोटींत घालणार नाही. नेति नेति.

भक्त म्हणतात, दोन्हीं कोटींत घालूं

सगुण निर्गुण एक गोविंदु रे।

ज्ञानदेव म्हणतात, कोटीच नाहीत आणि ईश्वर आहे. म्हणून तर्काचें कामच नाहीं.

बाप रखुमादेवीवरू विठ्ठलु रे।

मी याच तत्त्वाला अनुसरलो आहें. ज्ञानदेव आणि शिवराय या महाराष्ट्राच्या मातींत, येथल्या डोंगर पर्वतांत, येथील वनराईंत, इयें देशीच्या जन-जीवनांत पर्यायाने जगज्जीवनांत अखंड आहेत. म्हणून तर आज घडीलाहि मराठी भाषा उणे ज्ञानेश्वरी = ० म्हणजे कांहींच शिल्लक राहत नाही. आणि महाराष्ट्र उणे शिवराय = ० अशी स्थिती आहे.

शके बाराशतें बारोत्तरें। तैं टीका केली ज्ञानदेवें।। हें महाराष्ट्राच्या जीवनांतील अपूर्व योग असलेलें सुवर्ण-संवत्सर आहें. या समयीं या महाकान्तारांमध्यें ज्ञानदेवीचा आविर्भाव झाला.

यावेळीं एक युगपरिवर्तनच झालें. अशाप्रकारे ज्ञानदेव महाराष्ट्राचे युगपुरूष असल्याचे प्रत्ययास

येते. याच दृष्टीनें त्यांना शककर्ता म्हणावयास कोणता प्रत्यवाय आहे?

ज्ञानदेवांची अष्टौप्रहर स्मृति रहावी म्हणून आमच्या 'महाराष्ट्र पंचांग दिनदर्शिकेंत' आम्ही शालिवाहन शक १२१२ हा ज्ञानदेव शकाचा प्रारंभकाल म्हणून स्वीकारला आहे. शिवस्मरणासाठीं ''शिवराज्याभिषेक दिन'' यासारखा सुयोग अन्य कोणताहि ठरूं शकत नाही. कारण तो शिवशकाचा प्रारंभकाल आहे. या दोन नरोत्तमांच्या कार्याचें योग्य मूल्यमापन होण्यासाठीं यासारखे सुयोग्य प्रसंग दुसरें कोणतेच दिसत नाहीत.

आतां ज्ञानदेवासंबंधीं इतकेच म्हणतां येईल कीं, ज्ञानदेवी हें ज्ञानदेवांचें स्वत:सिद्ध स्वरूप आहे. ज्ञानदेवीच्या ९ हजार ओव्यांत ज्ञानदेव पूर्णत: सामावले आहेत. तेथेच त्यांचें खरे दर्शन होईल.

ज्ञानदेवांच्या जीवनासंबंधीं, प्रत्यक्ष समोर असलेली ज्ञानदेवी, हें चक्षुर्वैसत्यं प्रत्यक्ष प्रमाण आहें. बाकीच्या इतर प्रामाण्यांचा काथ्या कुटण्यांत काडीइतकाहि लभ्यांश नाही. कारण ज्ञानदेवांच्या जीवनांतील एकहि घटना ऐतिहासिकदृष्ट्या

अद्यापपावेतों सिद्ध झालेली नाहीं आणि यापुढेहि सिद्ध होणे सुतराम शक्य नाही,

अशा स्थितींत निरर्थक भोळाभाव कशासाठीं हवा? तो कांहीं उपलब्धी करून देईल ही आशा व्यर्थ आहे.

समर्थ म्हणतात,

म्हणोनी जितुका भोळा भाव। तितुका अज्ञानाचा ठांव। अज्ञानें तरी देवाधिदेव। पाविजेल कैसा।।

शालिवाहन शक १२१२ पासून ज्ञानदेव ज्ञानदेवीच्यारूपांत घराघरांत आणि प्रत्येकाजवळ आले; ते अद्यापहि तसेच आहेत. ज्ञानदेवी तुमच्या जवळ असली म्हणजे ज्ञानदेवहि अति निकट असतात, हें सत्य सूर्य-प्रकाशासारखे स्पष्ट आहें. ज्ञानदेव होते हा भ्रम आहे. ते सदैव आहेत. आजमितीस ७१३ वर्षें पूर्ण होऊन ७१४ वे वर्ष चालूं आहें तरीहि ते सदैव तसेच आहेत.

‘‘देखा विवेकी जे होती । ते दोहीतेहि न पाहती । जें होय जाय हें भ्रांति । म्हणूनिया ।। तैसे शरीराच्या लोपीं । सर्वथा नाशूं नाहीं स्वरूपीं । म्हणवुनी तूं हे नारोपी । भ्रांति बापा ।।

युगप्रवर्तक ज्ञानदेव महाराष्ट्राचें जीवन आहेत म्हणून ज्ञानदेवशक मी बुद्धिपुरःसर स्वीकारला आहे. आजमितीस ज्ञानदेवशक ७१४ आहे आणि शिवशक ३३० आहे.

महाराष्ट्र म्हटले कीं, शिवछत्रपतींचें स्मरण होतें. याच न्यायानें महाराष्ट्राचें अंतर्जीवन ज्ञानदेवांनी घडविलें आहें; कारण ज्ञानदेव महाराष्ट्राचें पितृतीर्थ आहेत. कल्पना करूं कीं, महाराष्ट्रांतून ज्ञानेश्वरीच्या सगळ्या प्रती जप्त झाल्या. महाराष्ट्राच्या कुठल्याहि गावांत व घरांत एकहि प्रत मिळत नाही. ज्ञानेश्वरी नुसती पाहण्यासहि मिळत नाही, अशी स्थिती झाली तर काय होईल?

काय होईल म्हणून काय विचारतां! आम्ही गळा काढून रडत बसूं. एकाद्या मायचें एकादे लेकरूं! त्याची माय त्याला सोडून गेल्यावर त्याची काय अवस्था होईल! अगदी तसेच आमच्याहि बाबतींत घडेल.

ज्ञानेश्वरी आमची आई आहे. महाराष्ट्रांतील सुशिक्षित-अशिक्षित, जाणते-नेणते, सर्वांना इचा ळळा लागला आहे.

ज्ञानेश्वरी हें अमोलिक रत्न आम्हांस प्राप्त झालें आहें.

अमोलिक रत्न जोडलें रे तुज । कां रे ब्रह्म-बीज नोळखसीं । ज्ञानदेव म्हणे अविनाश जोडलें । आणूनी ठेविलें गुरू-मुखीं ।।

ज्ञानदेव म्हणतात, आत्मज्ञान कायमचें माझ्या हातांत आलें आहें आणि गुरू-मुखानें लाभलेल्या शब्दांत मी तें साठवून ठेवलें आहें. ती साठवण म्हणजे ज्ञानदेवी, ज्ञानेश्वरी.

आणि ती प्रकट झाली, त्या संवत्सरापासून मी ज्ञानदेवशकाचा प्रारंभकाल धरला आहे.

इति लेखनसीमा

**आप्पा ठोंबरे.**

मार्गशीर्ष व।। द्वितिया शके १९२५

दिनांक : १०/१२/२००३

श्री. ज्ञानेश्वर दाभाडे,
सप्रेम नमस्कार.

तारूण्यासारखी अद्भुत् वस्तूं जगांत दुसरीं कोणतीच नाही. याहिपेक्षां विस्मय असा कीं, तारूण्य ही एकमेव सुसंधी आहे, हे नेमके ओळखून आपले जीवन सुवर्णाप्रमाणें कान्तिमान करण्यास जे प्रवृत्त होतात, त्यांच्यातील आकाशगामीं व्यक्तित्त्वाची बीज-रूपानें दिसून येणारी श्रेष्ठता ***Greatness*** चित्ताला विलक्षण आकर्षून घेते.

मी अगदी खरे सांगतो कीं, तुम्हीं तुमचें ‘ज्ञानेश्वर’ हें नांव सार्थ केले आहे. कित्येक दिवसांनी असे युवा व्यक्तित्त्व पाहण्यांत आलें.‘‘ऐसा पुरूष तो पाहावा। जनास वाटे हा असावा।।’’असे मलाच नव्हें, तर कोणालाहि वाटेल.

माझ्यापेक्षां तुम्हीं बरेच लहान आहांत तरीहि तुम्हीं महान आहांत हें कबूल करणें भाग आहे. ऐहिक आणि पारमार्थिक अशा उभय क्षेत्रांत लीलया संचार करणाऱ्या तुमच्या सव्यसाची व्यक्तित्त्वास,

दिनांक:— आदरपूर्वक स्नेहोपायन
१०/१०/२००५. आप्पा